वर्धा जिल्ह्यात नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्यासाठी कृषि विभागाच्या अखत्यारीतील मौजे जांब, ता. समुद्रपुर, जि. वर्धा येथील भूमापन स.नं.३२० एकूण क्षेत्रफळ २०.७२ हे.आर पैकी १२.०० हे.आर जागा वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास **हस्तांतरीत करण्यासाठी महसूल विभागाकडे प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२५/प्र.क्र.३४/१३-अे**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ०६ मे, २०२५.

वाचा:- १) शासन निर्णय, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, क्र.एमईडी-२०२२/ प्र.क्र.२२९ (भाग-ब)/२२/शिक्षण-१, दि.१२.०९.२०२४
२) जिल्हाधिकारी, वर्धा यांचे पत्र क्र.अका/जमीन/कावि-१७०१/ २०२४, दि.११.१०.२०२४
३) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.कृआ/ फलो-२/शारोवा/जागा/हस्तांतर/५९१६/२०२५, दि.१३.०३.२०२५
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग, क्र.फरोवा-२०११/प्र.क्र.२१५/ १३-अे, दि.१७.१०.२०११
५) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, क्र.जमीन ०४/२००६/प्र.क्र.३५/ ज-१, दि.०८.०९.२००८

**प्रस्तावना :**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या संदर्भिय क्र.१ येथील दि.१२.०९.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये वर्धा जिल्ह्यात नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याच्या प्रयोजनार्थ दि.०५.०२.२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये नमूद "हिंगणघाट" या जागेऐवजी कृषि विभागाच्या अखत्यारीतील "मौजे जांब, ता. समुद्रपुर, जि.वर्धा" येथील भूमापन क्र.३२० मधील खाते क्र.२२२ ही जागा निश्चित करण्यास मान्यता देण्यात आली आहे. तथापि, ही जागा जिल्हाधिकारी, वर्धा यांचेमार्फत अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वर्धा यांच्या नावे अद्यापपर्यंत हस्तांतरीत झालेली नाही. यास्तव जिल्हाधिकारी, वर्धा यांच्या दि.१२.८.२०२४ व दि.११.१०.२०२४ रोजीच्या पत्रांच्या अनुषंगाने उपरोक्त नमूद जागेच्या नि:शुल्क हस्तांतरणाबाबत जिल्हाधिकारी, वर्धा यांना आवश्यक सूचना देण्याबाबत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाकडून कृषि विभागास विनंती करण्यात आली होती. त्यानुषंगाने वर्धा जिल्ह्यात नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्यासाठी कृषि विभागाच्या अखत्यारीतील मौजे जांब, ता. समुद्रपुर, जि. वर्धा येथील भूमापन स.नं.३२० एकूण क्षेत्रफळ २०.७२ हे.आर पैकी १२.०० हे.आर जागा वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास हस्तांतरीत करण्यासाठी सदर जागा

महसूल विभागाकडे प्रत्यार्पित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

कृषि विभागाच्या अखत्यारीतील मौजे जांब, ता.समुद्रपूर, जि.वर्धा येथील स.नं.३२० मधील तालुका फळ रोपवाटीकेच्या एकूण क्षेत्रफळ २०.७२ हे.आर पैकी १२.०० हे.आर जमीन नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित ४३० रुग्णखाटांचे रुग्णालय स्थापन करण्याकरीता वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास हस्तांतरीत करण्यासाठी महसूल विभागाकडे प्रत्यार्पित करीत आहे.

२. महसूल व वन विभागाच्या आदेशानंतर जमीन वाटप करताना जमिनीचा निश्चित कोणता हिस्सा प्रत्यार्पित करावयाचा आहे, या संदर्भात जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा यांच्या सल्ल्याने जिल्हाधिकारी, वर्धा यांनी जमिनीचे आरेखन निश्चित करुन व मोजणी करुन जमीन हस्तांतरणाबाबतची कार्यवाही करावी.

३. कृषि विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील दि.१७.१०.२०११ च्या शासन परिपत्रकातील तरतुदींना अपवाद करुन शासन मान्यतेनुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७/ज-८ दि.२२.०४.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०५०६१५३०३०८९०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SHRIKANT CHANDRAKANT ANDGE
Date: 2025.05.06 15:31:55 +05'30'

**( श्रीकांत आंडगे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधान परिषद, मुंबई यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधान सभा, मुंबई यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री (सर्व) महाराष्ट्र राज्य, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
८. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

१२.सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, गो.ते.रुग्णालय, मंत्रालय, मुंबई
१३.आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४.जिल्हाधिकारी, वर्धा.
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
१६.अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, वर्धा.
१७. संचालक (फलोत्पादन), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. संचालक (नि.व गु.नि.), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१९.सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
२१.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा.
२२.जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा.
२३.निवडनस्ती/का.१३-अे

**प्रत, माहितीकरिता सादर,**

१. मा. मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. मंत्री (फलोत्पादन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई